**कृषि प्रक्रिया सहकारी संस्था-**
**राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना त्यांचेकडून सन सन २०१६-२०१७ ते २०२०-२१ पर्यंत प्राप्त कर्ज व त्यावरील २०.९.२०२२ ते १९.९.२०२३ या कालावधीतील व्याज सन २०२३-२४ च्या मंजूर अनुदानातून /तरतुदीतून परतफेड करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.७९/१-स**
नवीन प्रशासकीय इमारत, १४ वा मजला, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २८ मार्च , २०२४.

वाचा:-

१) या विभागाचा शासन निर्णय क्र.प्रक्रिया ११२००४/प्र.क्र.१६२(अ)/९-स, दि.१२.१०.२००७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.०५.२०१६
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३ व दिनांक ०४.०३.२०२४.
४) उप निर्देशक (वित्त), राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.NCDC:A&C/IX(१)/Rep/०९/, दि.२३.०६.२०२३ व दि.२८.०७.२०२३ रोजीचा ईमेल संदेश.

प्रस्तावना:-

राज्य शासन (सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (पणन प्रभाग ) ) राष्ट्रीय सहकार विकास निगम पुरस्कृत योजनांतर्गत कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांना प्रकल्पांच्या उभारणीकरिता विहीत केलेल्या आकृतीबंधानुसार/योजनेच्या मंजूर वित्तीय आराखड्यानुसार शासकीय भागभांडवल तसेच कर्ज उपलब्ध करुन देते. राष्ट्रीय सहकार विकास निगमामार्फत या योजनेअंतर्गत राज्य शासनास उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी राज्य शासनावर संपूर्णपणे कर्ज म्हणून गणला जातो. सन २०२०-२१ पर्यंत राज्य शासनास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने मंजूर केलेल्या कर्जापैकी, परतफेडीकरिता पात्र कर्जातील मुद्दलाची व मंजूर कर्जावरील दिनांक २२.०९.२०२२ ते १९.९.२०२३ या कालावधीतील व्याजाच्या देय हप्त्यांची परतफेड करण्याकरिता रा.स.वि.नि.ने संदर्भाधीन क्र.४ येथे नमूद केलेल्या पत्रान्वये राज्य शासनास सुचित केले आहे. सदर पत्रानुसार सन २०२१-२२ पर्यंत राज्य शासनास मंजूर करण्यात आलेल्या, कर्जापैकी मुद्दल रु. २,१०,०७,४००/- व व्याज रु. ६२,४३,८६६/- असे एकूण रु. २,७२,५१,२६६/- एवढी रक्कम राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने अदा करण्याची विनंती शासनास केली आहे. राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने कळविल्यानुसार /प्रस्तावित केल्यानुसार दि.२०.०९.२०२३ पूर्वी रक्कम अदा केल्यास व्याजावर रु. ५,६४,६७९/- इतक्या रकमेची सूट (Rebate) मिळणार आहे. म्हणजेच रु.२,१०,०७,४००/- मुद्दल व रु. ५६,७९,१८७/- इतकी व्याजाची रक्कम अशी एकुण रु. २,६६,८६,५८७/- इतकी रक्कम रा.स.वि.नि.ला दि.२०.०९.२०२३ पर्यंत अदा करणे आवश्यक होते. त्याकरिता, सन २०२३-२४ या वर्षात रा.स.वि.नि. कर्जाच्या मुद्दलाची परतफेड करण्याबाबतच्या लेखाशिर्षाखाली (६००३ ०४५८) रु. २,३१,०८,०००/- व रा.स.वि.नि. कर्जाच्या मुद्दलावरील व्याजाच्या परतफेडीबाबतच्या लेखाशिर्षाखाली (२०४९ २७११) रू.६८,६८,०००/- असा एकूण रू. २,९९,७६,०००/- इतका निधी अर्थसंकल्पिय अंदाजाद्वारे उपलब्ध झालेला आहे. उक्त नमूद सूट (Rebate) मिळण्याचा दिनांक उलटून गेल्यामुळे सदर निधीमधून सन २०२३-२४ या वर्षामध्ये रु मुद्दल रु. २,१०,०७,४००/- व व्याज रु. ६२,४३,८६६/- असे एकूण रु. २,७२,५१,२६६/- इतकी रक्कम रा.स.वि.नि.ला अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:**

राज्यातील सहकार विकासाकरिता राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी पणन विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांच्या अर्थसहाय्याकरिता राज्य शासनास कर्ज मंजूर केले होते. सदरच्या कर्जाची मुद्दल रु. २,१०,०७,४००/- (दोन कोटी दहा लाख सात हजार चारशे फक्त) व व्याज रु. ६२,४३,८६६/- (रुपये बासष्ठ लाख त्रेचाळीस हजार आठशे सहासष्ठ फक्त) असे एकूण रु. २,७२,५१,२६६/- ( दोन कोटी बहात्तर लाख एक्कावण्ण हजार दोनशे सहासष्ठ फक्त ) इतकी रक्कम इतकी रक्कम सन २०२२-२३ पर्यंत परतफेडीच्या हप्त्यापोटी राष्ट्रीय सहकारी विकास निगमाला अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च चालू आर्थिक वर्षात (सन २०२३-२४) खालील लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पिय अंदाजाद्वारे उपलब्ध झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा,

२.१) कर्ज- रु. २,१०,०७,४००/- (रूपये दोन कोटी दहा लक्ष सात हजार चारशे फक्त)

**मागणी क्रमांक व्ही-४ -**

मुख्य लेखाशिर्ष

६००३, राज्य शासनाचे देशांतर्गत ऋण

(१०८), राष्ट्रीय सहकार विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे

(००) (०२) राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे (पणन) (अनिवार्य) भारित (६००३०४५८)

भारित- ५६ कर्जाची परतफेड

**२.२)** व्याज- ६२,४३,८६६/- (रुपये बासष्ठ लाख त्रेचाळीस हजार आठशे सहासष्ठ फक्त) **मागणी क्रमांक व्ही-१**

मुख्य लेखाशिर्ष

२०४९, व्याज प्रदाने

०१, देशांतर्गत ऋणावरील व्याज

२००, देशांतर्गत इतर ऋणावरील व्याज

(०२) कर्जावरील व्याज

(०२) (०७) राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळणाऱ्या कर्जावरील व्याज (पणन) (अनिवार्य)

(२०४९ २७११)

भारित-४५, व्याज

३. राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना मंजूर केलेली उपरोल्लिखित रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरण करून राष्ट्रीय सहकारी विकास निगमाला त्याचे वितरण करण्यासाठी श्री.सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी, रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच, श्री.सं.पु.खोरगडे, सह सचिव (सहकार,पणन व वस्त्रोद्योग ), (V००१०) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. उपरोल्लेखित रक्कम RTGS सुविधेद्वारे राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना अदा करावयाची असून त्याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे आहे-

| | |
|---|---|
| Name of the account | National Cooperative Development Corporation |
| Name of the Bank | State Bank of India |
| Name of the Branch | Commercial Branch, Nehru Place, Delhi |
| Account No. | 32164052874 |
| IFSC Code | SBIN0004298 |

५. राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी सदर रक्कम प्राप्त झाल्याची पोच महाराष्ट्र शासनास नोंदणीकृत डाकेने/ई-मेलद्वारे मुद्रांकित पावती पाठवावी.

६. संदर्भाधीन क्र.३ येथील वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ व दिनांक ४.३.२०२४ च्या शासन परिपत्रकातील अटींची तसेच, त्यासोबतच्या परिशिष्टातील प्रस्तावाला लागू असलेल्या अटींची पूर्तता होत असल्याचे (परिशिष्टातील अनुक्रमांक ८ येथील अट वगळून) प्रमाणित करण्यात येत आहे.

७. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.५४०/२०२३/व्यय-२, व अनौ.संदर्भ ५५/२०२३/ ऋण व हमी, दि.२७.०३.२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे. -

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३२८१७४११४३२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2024.03.28 17:50:55 +05'30'

**( डॉ. सुग्रिव धपाटे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अप्पर मुख्य सचिव, (सहकार व पणन) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) उप सचिव (अर्थसंकल्प/पणन) यांचे स्वीय सहायक , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) अवर सचिव/ कक्ष अधिकारी, ( ९स, १६ स, १७ स, २१स, २४स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी (सेखशाखा) तथा आहरण व संवितरण अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.( ३ प्रतीसह)
५) कक्ष अधिकारी (व्यय-२/अर्थोपाय/अर्थसंकल्प- १३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे.
१०) पणन संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
११) सह संचालक, लेखा व कोषागरे (संगणक शाखा) नवीन प्रशासक भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई.
१२) संचालक/ उप निदेशक (वित्त) राष्ट्रीय सहकार विकास निगम, ४ सिरी इन्स्टिट्यूट यूशनल एरिया, हौजखास, नवी दिल्ली ११०००१.
१३) क्षेत्रीय संचालक, राष्ट्रीय सहकार विकास निगम, ५. बी. जे. रोड, पुणे.
१४) निवडनिस्ती (१-स).